(१०३) 2015062212123114362 7

टेंभी खोंडावे खारभूमि विकास योजना,
ता. पालघर, जि. ठाणे
सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान
करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. खाभूयो २००६/३६३/(१३८/२००६)/खारभूमि
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ५ एप्रिल, २००६

पहावे- १) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई, यांचे दिनांक १८/३/२००६ चे पत्र क्रमांक ८१.०१/(१५७/९६)/तां-१/१२१७

प्रस्तावना:

ठाणे जिल्ह्याच्या पालघर तालुक्यातील टेंभी खोडावे खारभूमि विकास योजनेच्या रु. १६.७० लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास शासन निर्णय, पाटबंधारे विभाग क्र. खारभूमि/१/८६/(३८७/८६)/खारभूमि, दिनांक २८/१/१९८७ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती.

सदर योजनेस सन १९९२ पर्यंत अनुदान प्राप्त झाले नसल्याने व सदर मान्यता व्यपगत झाल्यामुळे योजनेस शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्र. खाभूयो १०९७/४०/(७/९७)/खारभूमि, दिनांक २०/५/१९९७ अन्वये रु. ४२.९३ लक्ष रकमेस पुनःप्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. त्यानंतरही योजनेस ५ वर्षात अनुदान प्राप्त न झाल्यामुळे पुनःप्रशासकीय मान्यताही व्यपगत झाल्यामुळे या योजनेस शासन निर्णय, क्रमांक खाभूयो २००३/(२३४/२००३)/खारभूमि, दिनांक १४/१०/२००३ अन्वये पुनःप्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली. या नुसार योजनेचे काम मार्च, २००४ मध्ये सुरु झाले. सद्यःस्थितीत काम प्रगतीपथावर असून, सन २००३-०४ ची दरसूची वापरुन योजनेचे सुधारित अंदाजपत्रक तयार करुन रु. २,३४,९३,४९३/- किंमतीच्या प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबतचा प्रस्ताव मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचेकडून प्राप्त झाला होता. तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय :

१) ठाणे जिल्ह्याच्या पालघर तालुक्यातील टेंभी खोडावे खारभूमि विकास योजनेस सन २००३-२००४ च्या दरसूचीवर आधारित सुधारित केलेल्या प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रु. २,३४,९३,४९३/- (दोन कोटी चौतीस लक्ष, त्र्याण्णव हजार, चारशे त्र्याण्णव , यापैकी रु. १,८७,१९,९१५/- कामाप्रीत्यर्थ व रु. ४७,७३,५७८/- आनुषंगिक खर्च ) रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यांत येत आहे. अंदाजपत्रकाचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यांत आला आहे.

२) या योजनेच्या कामावरील खर्च "मागणी क्र. आय-३/मुख्य लेखाशीर्ष ४४०२-मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृदसंधारण-खार जमीन योजना (१) बांधकामे - योजनांतर्गत" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागवावा.

हा शासन निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्र. एपीएच १०७३/३२६५३/ई(३), दिनांक १७/७/१९७४ मधील परिशिष्ट क्रमांक ३ अ व शासन निर्णय पाटबंधारे विभाग क्र. संकीर्ण १०९९/१२६/९९/मोप्र (प्र.), दि. १८/५/१९९९ मधील तरतूदीनुसार आंतरवित्त सल्लागार व उपसचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान केलेली सुधारित प्रशासकीय मान्यता अ.क्र. '४/२००६' वर नोंदविण्यात आलेली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( शिवकुमार गिरी)
शासनाचे उप सचिव

प्रत अंदाजपत्रकाच्या गोषवाऱ्यासह:-

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर.
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई.
नियोजन विभाग, (कार्यासन १४६१) मंत्रालय, मुंबई.
मुख्य अभियंता (दवप्र) व सहसचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई.
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई.
आंतर वित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
अधीक्षक अभियंता, खारभूमि विकास मंडळ, ठाणे.
उपसचिव (लघु पाटबंधारे) / अवर सचिव (खारभूमि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपअभियंता (खारभूमि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी अभियंता, खारभूमि विकास विभाग, ठाणे (५ प्रती)
अर्थशाखा (३ प्रती) / लपा-१, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
जिल्हाधिकारी, ठाणे
स्वीय सहायक, मंत्री (खारजमिनी) मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, राज्यमंत्री (खारजमिनी) मंत्रालय, मुंबई
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
खारभूमि कार्यासन (संग्रहार्थ)

(दिनांक ५ एप्रिल, २००६ चा शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्र. खाभूयो २००६/३६३/
(११८/०६)/खारभूमि चे सहपत्र)

------------X-----------

विवरणपत्र

टेंभी खोडावे खारभूमि विकास योजना, ता. पालघर, जि. ठाणे

(अंदाजपत्रकाचा गोषवारा)

| अ.क्र. | बाब | एकूण (रु.) |
|---|---|---|
| १. | ए-प्राथमिक | १,१८,६०५ |
| २. | बी-भूसंपादन | - |
| ३. | सी. कामे | ९१,८०,९१९ |
| ४. | एफ- आरएचटी कामे | ७२,४४,३१५ |
| ५. | के- इमारती | ३,२८,५०५ |
| ६. | एम- वृक्षारोपण | ७,४९,५६५ |
| ७. | ओ- संकीर्ण | ४५,९०५ |
| ८. | पी- देखभाल | ४१,०६३ |
| ९. | आर-दळणवळण | १०,११,०३८ |
| | एकूण | १,८७,१९,९१५ |
| | आनुषंगिक खर्च<br>(भूसंपादन किंमत वगळून २५.५० टक्के) | ४७,७३,५७८ |
| | एकूण | २,३४,९३,४९३ |

ठळक वैशिष्टये:

| | |
|---|---|
| पुन:प्रापित होणारे क्षेत्र (हेक्टर) | ३०४.५० हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | ७७१५४ < ९५,०००/- .. ठिक आहे. |
| लाभव्यय गुणोत्तर | ४.३६ > १.०० .. ठिक आहे |
| दरसूची वर्ष | २००३-२००४ |